# जिप्सी मुलीचे सुंदर बूट



लेखिका: ॲनी रॉकवेल

मराठी अनुवाद: तृप्ती कर्णिक



# जिप्सी मुलीचे सुंदर बूट

लेखिका: ॲनी रॉकवेल

मराठी अनुवाद: तृप्ती कर्णिक

मॅगी नावाची एक गोड जिप्सी मुलगी होती. जिप्सी आईबाबांसोबत ती जगभरात वेगवेगळ्या ठिकाणी भटकायची. एके दिवशी ते एका भल्या मोठ्या शहरात आले.



तिथल्या एका रिकाम्या दुकानात त्यांनी आश्रय घेतला. त्याची पुढची बाजू गडद निळ्या रंगाची होती. मॅगीची आई काचेच्या गोलात पाहून भविष्य सांगायची. दुकानातल्या पडद्यामागे ते राहायचे. अनेक ठिकाणी राहून आल्यामुळे त्यांना त्या त्या ठिकाणाची खूप गाणी येत होती. ती गाणी ते रोज संध्याकाळी म्हणायचे. खूपच आनंदी कुटुंब होतं ते!



ज्या दुकानात त्यांनी आसरा घेतला होता ते एकेकाळी चपलांचं दुकान होतं. एके दिवशी मॅगीच्या बाबांना तिथल्या एका खणामध्ये चपलांचा बॉक्स मिळाला. त्यात लाल रंगांचे सुंदर चकचकीत चामड्याचे बूट होते आणि गंमत म्हणजे तेही बरोबर मॅगीच्या मापाचे! मॅगीने आतापर्यंत इतके सुंदर बूट कधीच बघितले नव्हते.

हे बूट घालून नाच करायला कसली मजा येईल! मॅगी ह्या विचाराने हरखून गेली.



मॅगी ते सुंदर बूट दाखवायला आईकडे पळत आली. त्यावेळी आई शोभिवंत टोपी घातलेल्या बाईसोबत बसली होती. "किती गोड आहेत!" तिची आई उद्गारली. "आणि मापाचे असल्यामुळे मज्जा आहे एका मुलीची!"

"आई, मी ह्या नवीन बुटात तुला नाचून दाखवू का?" मॅगीने विचारलं.

"थोड्या वेळाने हं," आई तिला हळूच म्हणाली. "आता की नाही, ह्या बाईंना मला भविष्य सांगायचं आहे. जा, थोडा वेळ खेळायला बाहेर पळ."



मग चमकणारे नवे कोरे
लाल लेदरचे बूट पायात घालून

गोड जिप्सी मुलगी, मॅगी,
रस्त्यावरून खाली चालू लागली.

खाली कोपऱ्यावर असलेल्या अग्निशामक दलाच्या केंद्रावर ती गेली आणि तिथल्या जवानाला म्हणाली, "ह्या नवीन चमकणाऱ्या लाल बुटात मी तुमच्यासाठी छानसा नाच करू का?"

पण तेवढ्यात जोरजोरात बंबाचा सायरन वाजू लागला. साऱ्या जवानांनी गाडीत भराभर उड्या मारल्या. "आम्हाला तातडीने आग विझवायला जावं लागतंय. तुझा नाच दाखवायला थोड्या वेळानी येशील का ?" एक जवान म्हणाला.

आणि दिवा गरगर फिरवत सायरन वाजवत ती भली मोठी लाल बंबाची गाडी निघून गेली सुध्दा.



मॅगी मग रस्त्यावरून पुढे चालत निघाली. तिथे तिला बेकरी लागली. ती आत घुसली आणि तिथल्या वस्तू विकणाऱ्या बाईला म्हणाली, "माझ्या ह्या नव्या कोऱ्या बुटात तुम्हाला नाच करून दाखवू का?"

"आता नको हं बाळा," ती बाई म्हणाली. "आम्हाला किनई आज लग्नाचे आणि वाढदिवसाचे खूप सारे केक बनवायचे आहेत. पण तुला ह्यातलं जे आवडेल ते बिस्कीट मात्र घेऊ शकतेस."

मॅगीने मग त्यातलं एक चॉकलेट बिस्कीट उचललं आणि त्या बाईचे आभार मानून ती बाहेर पडली.



तिथून बिस्कीट खात खात ती पुढच्या कोपऱ्यापर्यंत आली. तेवढ्यात तिला रस्त्याच्या मधोमध काही माणसं झाकण उघडून आत जाताना दिसली. तिने त्यांना जोरात हाक मारली आणि विचारलं, "ह्या सुंदर बुटामधला माझा नाच पाहायला तुम्हाला आवडेल का?"

"सॉरी हं गोड जिप्सी मुलगी," त्यांच्यातील एक माणूस म्हणाला, "आम्हाला खाली जाऊन वायर जोडण्याची खूप सारी कामे पूर्ण करायची आहेत. त्यामुळे तुझा नाचाचा कार्यक्रम पाहायला आमच्याकडे मुळीच वेळ नाही आहे." आणि ते क्षणात जमिनीच्या खाली गुडूप झाले.



मॅगी परत फिरली. तिथे एक पेट शॉप होते. त्यात कुत्रे, मांजरे, पांढरे उंदीर, पक्षी, मासे खच्चून भरले होते. तिथे जाऊन नाचावं का असा विचार तिच्या मनात आला. पण तिकडे कुत्र्याचं भुंकणं, पक्षांचा किलबिलाट आणि पिंज-यातील पोपटाचं कर्कश्श ओरडणं असा सगळा गोंधळ चालू होता. फक्त मासे तेवढे त्या पाण्याच्या पेटीमध्ये बुडबुडे उडवत शांत फिरत होते.

“ह्या गोंगाटात तर माझ्या डफलीची किणकिणही कुणाला ऐकू येणार नाही.” पुटपुटत ती दुकानातून बाहेर पडली.



मॅगीला आता थोडं उदास वाटू लागलं. म्हणून तिथल्या फुलांच्या दुकानात फुलांचा वास भरभरून घेण्याच्या विचाराने ती आत शिरली. तिने हळू आवाजात तिथल्या तरुणीला विचारलं. "माझ्या नवीन सुंदर लाल बुटांमध्ये मी तुम्हाला नाच करून दाखवू का?"

"अरे व्वा! किती देखणे बूट आहेत तुझे!" ती तरुणी म्हणाली, "पण आज रात्री मिसेस फिल्डिंग-जोन्सकडे पार्टी आहे. त्यासाठी फुलांची सजावट करायची आहे. सॉरी, त्यामुळे मला जराही वेळ नाही आहे." मग ती हसली. "हा घे लाल गुलाब. तुझ्या बुटांना मॅचिंग आहे."

"धन्यवाद," मॅगी म्हणाली. आणि ती पुन्हा एकदा रस्त्याला लागली.






कधी खाली कधी वर अशी ती उगाचच रस्त्यावर भटकत राहिली,

कुणीतरी आपला नाच बघेल ह्या आशेवर पण छे, तिच्यासाठी कुणालाच वेळ नव्हता.

अशीच भटकत ती रस्त्याच्या एका टोकाला पोचली. तिथे बाग होती, मस्त गारेगार आणि हिरवीगार! कबुतरांचे गुटरगुम, खारुतायांची लगबग, वाऱ्यामुळे होणारी पानांची सळसळ! दुकानातल्या घरापासून इतक्या लांबवर मॅगी कधीच आली नव्हती आणि बागही तिने कधीच पाहिली नव्हती. ती बागेत शिरली.



तिथे काही लोक ऊन खात हिरवळीवर मस्त पहुडले होते. काही आज्या कबुतरांना दाणे घालत होत्या. तर पांढऱ्या फ्रॉक घातलेल्या दोन दाया एका बाकावर विणकाम करत बसल्या होत्या.

"हॅलो," मॅगी म्हणाली, "माझ्याकडे ना लाल रंगांचे चमकणारे नवे कोरे बूट, लालचुटूक गुलाब आणि डफली आहे. तुम्हाला मी छानसा नाच करून दाखवला तर चालेल का? मला खात्री आहे की तुम्हाला तो खूप आवडेल."

"नाही, अजिबात नाही," त्यातील एक दाई ओरडली, "तुझ्या नाचणाऱ्या पायांच्या आणि डफलीच्या आवाजाने आमच्या बाळांची झोपमोड होईल आणि मग ते भोकाड पसरतील."

"चल पळ बघू इकडून," दुसरी दाई म्हणाली, "आम्हाला इथे किंचितही आवाज नको आहे."



मॅगी तिथून हलकेच पायांचा आवाज न करता निघाली. जिथे कुणीही नव्हतं अशा ठिकाणी ती आली आणि तिथल्या रिकाम्या बाकावर बसली. नव्याकोऱ्या बुटातले पाय तिने खालीवर केले. सूर्याच्या किरणांमुळे ते जास्तच चमचम करत होते. मग तिने नाजूकपणे डफली वाजवली. त्या आवाजाने दाणा घेऊन जाणारी खारुताई एकदम थांबली आणि तिच्याकडे टकमक पाहू लागली.



त्या खारुताईला पाहून मॅगीचा चेहरा फुलला. "कदाचित ही छोटी खारुताई..." मॅगी म्हणाली, "हिला माझा नाच पाहायला नक्की आवडेल!" आपल्या एकमेव प्रेक्षकाला नाच दाखवण्यासाठी तिने बाकावरून टुणकन उडी मारली. तिने एका हाताने डफली वर पकडली, चमचमणाऱ्या बुटांमध्ये पाय घट्ट बसवले, लालचुटुक फुलाचा वास घेतला आणि नाचायला सुरुवात केली.





आणि ती नाचू लागली....



नाचू लागली.......



नाचत राहिली....



नाचतच राहिली.....

आणि डफलीवरची थाप थांबवून आणि शेवटची गिरकी घेऊन ती थांबली.

अरे पण हा कसला आवाज येतोय? टाळ्या आणि खिदळणं आणि कुणीतरी बोललं, "कसला अप्रतिम नाच! धन्यवाद! धन्यवाद!"

मॅगीने मागे वळून पाहिलं. तिथे एक सुंदर हसरी ताई आणि तिच्यामागे दहा चिमुकली मुलं उभी होती.



"किती अप्रतिम नाच!" ती ताई पुन्हा म्हणाली.

"आणि किती अवघड!" एक छोटी मुलगी बोलली.

"आणि किती वेगवान!" एक छोटा मुलगा म्हणाला.

"मला पण असा नाच आला तर किती मजा येईल," दुसरं मुलं म्हणालं.

"आम्हाला तुझा नाच पुन्हा पहायचा आहे. प्लीज, प्लीज, नाच ना अजून!" सगळे एकदम म्हणाले.

आणि मग छोटी जिप्सी मुलगी, मॅगी, पुन्हा नाचू लागली. तिचे नवीन सुंदर लाल बूट सूर्यकिरणांनी चमकत होते.





मग सगळी मुलं लोळली, खिदळली. हिरवळीवर पळू लागली.



आणि सगळ्यांनी मिळून तिथल्या झाडांची फुलं वेचली.

सगळ्यांची निघण्याची वेळ झाली. ताईने तिला तिचं नाव आणि ती कुठे राहते ते विचारून घेतलं. "मी तुझ्या आईशी बोलते," ती म्हणाली. "तू आमच्या शाळेत येशील का म्हणजे तुला हवं तेव्हा आम्हाला नाचून दाखवता येईल."

नवीन मित्र-मैत्रीणींना टाटा करून मॅगी पळतच बागेतून निघाली.






तिथून ती उड्या मारत,
गिरक्या घेतच निळ्या दारातून

घरात आली. तिचे नवे-कोरे सुंदर
लाल लेदर बूट अजूनच चमकत होते.

समाप्त